**पुणे महानगरपालिकेस २४x७ पाणी पुरवठा प्रकल्पासाठी कर्जरोखे उभारण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१७/ प्र.क्र.२७६/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १२ जून, २०१७

संदर्भ :-

आयुक्त, पुणे महानगरपालिका यांचे पत्र क्रमांक जा.क्र. मआ/१२, दिनांक ०७ जून, २०१७

प्रस्तावना-

पुणे शहराच्या पाणी पुरवठा वितरण व्यवस्थेत सुधारणा करण्यासाठी व शहरास होणारा पाणी पुरवठा (२४x७) समान पध्दतीने करणेसाठी पाणी पुरवठा व्यवस्थेमधील अस्तित्वातील जलशुध्दीकरण केंद्रे, पाण्याच्या टाक्या व वितरण व्यवस्था या संबधीत आवश्यक सर्वंकष सुधारणा करुन २४x७ समान पाणी पुरवठा करण्याची योजना पुणे महानगरपालिकेने तयार केली आहे. या योजनेसाठी कर्जरोखे उभारणेस मान्यता देण्याचा प्रस्ताव आयुक्त, पुणे महानगरपालिका यांनी संदर्भाधिन पत्रान्वये सादर केला होता. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

पुणे शहराच्या पाणी पुरवठा व्यवस्थेत सुधारणा सर्वंकष सुधारणा करुन २४X७ समान पाणी पुरवठा करण्याची योजना पुणे महानगरपालिकेने तयार केली आहे. या योजनेसाठी एकूण ३५१३ कोटी इतका खर्च येणार आहे. त्यापैकी, महानगरपालिकेकडील शिल्लक रक्कम, महानगरपालिकेस केद्रशासन पुरस्कृत योजनांमधून मिळणारा निधी विचारात घेतल्यांनतर उर्वरित रूपये २२६४ कोटींच्या मर्यादेत टप्प्याटप्प्याने कर्जरोखे उभारण्यास महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम १०९ नुसार खालील अटींसह राज्यशासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर कर्ज रक्कम व त्यावरील व्याजाची परतफेड करण्याची जबाबदारी पूर्णत: पुणे महानगरपालिकेची राहील. **यासाठी राज्य शासनाची कोणतीही हमी राहणार नाही.**

२. कर्जरोख्यांच्या परतफेडीसाठी महानगरपालिकेने **राष्ट्रीयकृत बँकेत एस्क्रो खाते** (Escrow Account) **उघडून परतफेड वेळेत होईल** याची दक्षता घ्यावी. त्यासाठी शासनाकडून कोणतेही सहाय्य करण्यात येणार नाही.

३. एकूण रूपये २२६४ कोटींच्या मर्यादेत महानगरपालिकेने आवश्यकतेनुसार हे कर्जरोखे टप्प्याटप्प्याने उभारावेत.

४. कर्जरोख्यांची उभारणी व त्याची परतफेड याबाबतचा अहवाल महानगरपालिकेने वेळोवेळी शासनास सादर करावा.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०६१२१३४८२४९०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2017.06.12 14:01:14 +05'30'

**( पां.जो.जाधव )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.राज्यमंत्री, नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव
३. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-२) मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे
५. निवड नस्ती (नवि-३३).